राष्ट्रीय ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची छाननी करण्यासाठी तांत्रिक छाननी समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-२०१८/प्र.क्र.४०/पापु-१०

जी. टी. हॉस्पिटल आवार, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१

तारीख: ७ ऑगस्ट,२०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दि.०९ जुलै २०१४

२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो- २०१८/प्र.क्र.५३/पापु-०७, दि.मार्च २०१८

३) २८ व्या राज्यस्तरीय योजना मंजूरीच्या दि. २९जून २०१८ रोजीच्या समिती बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्याबाबत संदर्भीय शासन निर्णय क्र.०१ अन्वये निर्देश देण्यात आले आहेत. तथापि स्थानिक स्वराज्य संस्थांकडे पुरेसे व सक्षम तांत्रिक मनुष्यबळ नसल्याने बऱ्याचशा पाणी पुरवठा योजनांची तांत्रिक छाननी व्यवस्थित होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. तसेच याबाबत २८व्या राज्यस्तरीय योजना मंजूरी समितीच्या बैठकीमध्ये सविस्तर चर्चा करण्यात येऊन यासाठी तांत्रिक छाननी समिती गठीत करण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे.

**शासननिर्णय -**

वरील वस्तुस्थिती पहाता राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांना तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी नवीन ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची छाननी करण्यासाठी अंदाजपत्रकीय रक्कम विचारात घेऊन शासन स्तरावर व प्रादेशिक विभाग स्तरावर तांत्रिक छाननी समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

अ) शासन स्तरावरील तांत्रिक छाननी समिती:-

| | | |
|---|---|---|
| १. | अप्पर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, | अध्यक्ष |
| २. | मुख्य अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,संबंधित प्रादेशिक विभाग, | सदस्य |
| ३. | मुख्य अभियंता ,तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, | सदस्य |
| ४. | सह संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे, | सदस्य |
| ५. | अधिक्षक अभियंता,(यांत्रिकी) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ठाणे, | सदस्य |
| ६. | उप अभियंता, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था ,बेलापूर , | सदस्य सचिव |

ब) प्रादेशिक विभाग स्तरावरील तांत्रिक छाननी समिती .

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्रधिकरण ,संबंधित प्रादेशिक, विभाग | अध्यक्ष |
| २. | अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, | सदस्य |
| ३. | कार्यकारी अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्रधिकरण, | सदस्य |
| ४. | कार्यकारी अभियंता ,जिल्हा परिषद ,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग , | सदस्य |

५.उप मुख्य कार्यकारी अधिकारी ,(पाणी व स्वच्छता )जिल्हा परिषद, सदस्य
६.सहा. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,संबंधित प्रादेशिक विभाग, सदस्य सचिव

शासन स्तरावरील तांत्रिक छाननी समिती मार्फत रू. १.०० कोटी व त्यापेक्षा जास्त अंदाजपत्रकीय रक्कम असलेल्या नवीन ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची छाननी करण्यात येईल. तसेच प्रादेशिक विभाग स्तरावरील तांत्रिक छाननी समितीमार्फत रू. १.०० कोटीपेक्षा कमी अंदाजपत्रकीय रक्कम असलेल्या नवीन ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची छाननी करण्यात येईल. सदर समित्यांची बैठक दरमहा किमान एकदा व आवश्यकतेनुसार आयोजित करण्यात यावी. सदर समितीमार्फत तत्वत: मान्यता प्राप्त झाल्यानंतर तांत्रिक व प्रशासकीय मान्यते बाबतची उचित कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०७१७०४१९६६२८असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपालयांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2018.08.18 12:35:47 +05'30'

**( वसंत भि. माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.अप्पर मुख्य सचिव ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे स्वीय सहाय्यक ,मंत्रालय ,मुंबई
२. उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ,मंत्रालय,मुंबई
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,मुंबई,
४. सर्व उप सचिव ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग मंत्रालय, मुंबई
५. मुख्य अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व) प्रादेशिक विभाग ,
६. अधीक्षक अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व) मंडळ ,
७. अधीक्षक अभियंता ,(यांत्रिकी)महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ ठाणे ,
८. सहसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०.संचालकपाणी व स्वच्छता सहाय्य संस्था बेलापूर,नवी मुंबई
११.कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ,
१२.कार्यकारी अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
१३.उप मुख्य कार्यकारी अधिकारी ,(पाणी व स्वच्छता)जिल्हा परिषद( सर्व).
१४.सर्व नियंत्रक अधिकारी , पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ,मंत्रालय ,मुंबई .
१५.निवडनस्ती पापु-१०.